**सन २०२१-२०२२ करिता राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरणांतर्गत लेखाशीर्ष (२०७० ०८८२) १०- कंत्राटी सेवांतर्गत एकूण रुपये ८,७२,५०० /- इतका निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :- अर्थसं - ११२१/ प्र.क्र.१३०/१३-स**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- ०९ फेब्रुवारी, २०२२

**वाचा :- १.** राज्य सहकारी निवडणुक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे, क्रमांक:- जा.क्र. रासनिप्रा / निवडणुक/ लेखा १- कक्ष/५/ हिवाळी पुरक मागणी /३५९६/२०२१, यांचे दिनांक ०३ नोव्हेंबर, २०२१ रोजीचे पत्र.

**२.** वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक: पूरक -२०२१/ प्र.क्र.१०६/अर्थ-३, दिनांक ०३ जानेवारी,२०२२.

**३.** सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्रमांक: पुरक -१९२१/ प्र.क्र.(११६/२०२१)/१७स, दिनांक ०४.०१.२०२२.

**प्रस्तावना :-**

राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे वाचा १ येथील प्रस्तावाच्या अनुषंगाने प्राधिकरणाच्या आस्थापनेवर बाह्यस्त्रोताद्वारे कंत्राटी लिपिक-टंकलेखक, कंत्राटी शिपाई, सेवानिवृत्त कंत्राटी अधिकारी व कर्मचारी यांचे दरमहा थकीत व नियमित परिश्रमिक यांची देयके अदा करण्यासाठी प्राधिकरणाने हिवाळी अधिवेशन डिसेंबर, २०२१ च्या पुरक मागणीच्या अनुषंगाने कंत्राटी सेवा या बाबीसाठी रुपये १९,११,१८९/- (अक्षरी रुपये एकोणीस लाख अकरा हजार एकशे एकोणनव्वद फक्त) इतक्या रकमेचा पुरक मागणीचा प्रस्ताव विधानमंडळास सादर करण्यात आला होता. त्यापैकी, मागणी क्र.व्ही-२, २०७० इतर प्रशासनीक सेवा (००) (८००)- इतर खर्च (००)(०१) राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण (अनिवार्य) (२०७० ०८८२) १०- कंत्राटी सेवा करिता रुपये १९,११,०००/- ( अक्षरी रुपये एकोणीस लाख अकरा हजार फक्त) इतका निधी पूरक मागणीद्वारे मंजूर करण्यात आलेला आहे.

वित्त विभागाच्या शासन निर्णय दिनांक १४.१०.२०२१ अन्वये डिसेंबर,२०२१ पर्यंतच्या अनिवार्य खर्चासाठी अर्थसंकल्पित तरतूदीच्या ७५% निधी वितरणास सहमती देण्यात आली आहे. राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरणाच्या आस्थापनेवर कार्यरत कंत्राटी अधिकारी / कर्मचारी यांच्या माहे ऑगस्ट २०२१ ते फेब्रुवारी २०२२ या कालावधीच्या मानधनासाठी २०७००८८२, १०-कंत्राटी सेवा या लेखाशिर्षातील एकूण अर्थसंकल्पित (मुळ+पुरवणी) तरतूद रुपये ४१.५८ लक्ष पैकी ७५% निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरणाच्या आस्थापनेवर कार्यरत कंत्राटी लिपिक-टंकलेखक, कंत्राटी शिपाई व सेवानिवृत्त कंत्राटी अधिकारी व कर्मचारी यांचे देयके अदा करण्यासाठी लेखाशिर्ष (२०७० ०८८२) (अनिवार्य), १०-कंत्राटी सेवा या उद्दीष्टांतर्गत रुपये १०००/- ची मुळ

अर्थसंकल्पित तरतूद करण्यात आली. तसेच, जुलै २०२१ च्या अधिवेशनात रुपये २२.४६ लक्ष इतकी पुरवणी मागणी मंजूर करण्यात आली व डिसेंबर, २०२१ च्या अधिवेशनात १९.११ लक्ष इतक्या रकमेची पुरवणी मागणी मंजूर करण्यात आली आहे. लेखाशिर्ष (२०७० ०८८२) (अनिवार्य), १०-कंत्राटी सेवा या उद्दीष्टांतर्गत (मुळ + पुरवणी) तरतूद रुपये ४१.५८ लक्ष पैकी ७५% निधी वितरीत करावयाचा आहे. सदर निधी पैकी रुपये २२.४६ लक्ष इतका निधी दिनांक ०६ सप्टेंबर,२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला आहे. **त्यामुळे रुपये ८,७२,५००/ (अक्षरी रुपये आठ लक्ष बाहत्तर हजार पाचशे फक्त) इतका निधी वितरणास या शासन निर्णयान्वये मान्यता दर्शविण्यात येत आहे.**

**२.** १०- कंत्राटी सेवा अंतर्गत निधी वितरणासाठी वित्त विभागाच्या दिनांक ०३ जानेवारी,२०२२ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये कंत्राटी सेवेतील कर्मचाऱ्यांचे परिश्रमिक/मानधनाचा खर्च १०- कंत्राटी सेवा या उद्दीष्टांतर्गत करण्यात यावा.

**३.** या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेला रुपये ८,७२,५००/- (अक्षरी रुपये आठ लक्ष बाहत्तर हजार पाचशे फक्त) इतका निधी वितरीत करण्यासाठी सहाय्यक निबंधक (अंदाज व नियोजन) सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी (V0004) म्हणून व सह सहकारी निवडणुक आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. निवडणूक प्राधिकरणांतर्गत कंत्राटी सेवा या बाबींकरीता वितरीत करण्यात येणारी रक्कम, राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, २०७० ०८८२ अंतर्गत, १०-कंत्राटी सेवा या लेखाशिर्षाखाली खर्ची पडेल.

**४.** सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौसं.क्र.१३/२०२२/व्यय-२,दिनांक ११.०१.२०२२ अन्वये दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

**५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२२०२०९११२४५४७२०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावावे.

Chaudhary Anil Jayaram

Digitally signed by Chaudhary Anil Jayaram
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-operation Marketing And Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f26cf80358fa3133e4d85ddac30ae54b06c63743fd5510dc0ebca082b6c483ce, serialNumber=d124ae9bbd15bed87dbd08ef779cf1b85a4020339eb1c2ef0e112fb67063011c, cn=Chaudhary Anil Jayaram
Date: 2022.02.09 11:29:12 +05'30'

**(अनिल ज. चौधरी)**

**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. सचिव, राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षण), महाराष्ट्र-१, मुंबई.
४. अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई/ पुणे.
५. अवर सचिव (१७स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. उप सचिव, व्यय-२ / अर्थ-१३, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

**प्रत :-**

१. मा. प्रधान सचिव (सहकार व पणन), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे वरिष्ठ स्वीय सहायक.
२. निवडनस्ती १३-स